आस्थापना - छत्रपती संभाजीनगर विभाग
एकूण १७८६ अस्थायी पदांना दिनांक
१ मार्च,२०२४ ते दिनांक ३१ ऑगस्ट,२०२४ या
कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी -२०२४/प्र.क्र.२९/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १५ मार्च, २०२४.

**संदर्भ :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. संकिर्ण-१००२/प्र.क्र. ६६(भाग-२ /ई-८,दि.२०/०३/२००६.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. प्राफेब-२०१०/प्र.क्र.२६/पुनर्बांधणी-३/म-१०,दि.३०/७/२०१३.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. ईएसटी-२०१७/प्र.क्र.३७/ई-८,दि.२५/०४/२०१७.
४) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१/०८/२०२३ व शासन शुध्दिपत्रक, दि.०६/०९/२०२३.
५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्रमांक : ईएसटी-२०२२/प्र.क्र.५२/ई-८,दि.२०/०९/२०२३
६) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि. २१/०२/२०२४.

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या दिनांक ३१/०८/२०२३ च्या शासन निर्णयास अनुसरुन विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर तसेच जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर, जालना, परभणी, हिंगोली, लातूर, नांदेड, उस्मानाबाद व बीड यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील १७८६ अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२३ ते दिनांक २९/०२/२०२४ या कालावधीसाठी महसूल व वन विभागाच्या दिनांक २०/०९/२०२३ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. वित्त विभाग,शासन निर्णय, दिनांक २१/०२/२०२४ अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर तसेच जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर, जालना, परभणी, हिंगोली, लातूर, नांदेड, उस्मानाबाद व बीड यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील १७८६ अस्थायी पदांना वरील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर तसेच जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर, जालना, परभणी, हिंगोली, लातूर, नांदेड, उस्मानाबाद व बीड यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील

आकृतीबंधातील १७८६ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/०८/२०२४ या कालावधीसाठी वित्त विभाग,शासन निर्णय, दिनांक २१/०२/२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च संदर्भाधीन क्र.०३ येथील शासन निर्णयासोबतच्या संबंधित विवरणपत्रातील रकाना - क्र.०५ मध्ये दर्शविलेल्या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ साठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २१/०२/२०२४ च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक असल्याचे तसेच यानंतर सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही, याची सर्व विभागांनी नोंद घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग,क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक २१/०२/२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१९१६१५४३६०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHRIRAM DATTATRAYA YADAV

Digitally signed by SHRIRAM DATTATRAYA YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9da0e03bd84c1e17d78ad320814d003150fbf7d2abd36f924e5705145bf0e270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50CB0CE4CC4FE54C74F42B860354E86EC00B3B36F5F215C9F7658E611006A200, cn=SHRIRAM DATTATRAYA YADAV
Date: 2024.03.19 16:25:09 +05'30'

**( श्रीराम यादव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर.
२) जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर / जालना/ परभणी/ हिंगोली/लातूर/ नांदेड/उस्मानाबाद /बीड.
३) अपर जिल्हाधिकारी/उप विभागीय अधिकारी/ तहसिलदार/मंडळ अधिकारी.(संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत)
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर / जालना/ परभणी/ हिंगोली/लातूर/ नांदेड/उस्मानाबाद /बीड.
६) उप सचिव, कार्यासन (आ.पु.क./व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) सह सचिव/ उप सचिव, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवड नस्ती, (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.